जागतिक बँक सहाय्यित “**Development of Applied Knowledge and Skills for Human Development**” **(DAKSH)** **प्रकल्पांतर्गत घेण्यात आलेल्या कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत....**

## महाराष्ट्र शासन

**कौशल्य, रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक दक्षप्र-२०२४/प्र.क्र.२३/व्यशि-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २९ मार्च, २०२५

**संदर्भ :-** १) कौ. रो.उ. व . विभाग, शा.नि. क्र.जाबँप्र -२०२३/प्र.क्र.०६/व्यशि-४, दि.१८/१२/२०२३.

२) कौ. रो.उ. व ना. विभाग, शा.नि. क्र. जाबँप्र -२०२४/प्र.क्र.०२/व्यशि-४, दि.०६/०९/२०२४.

३) म.रा.कौ.वि.सोसायटीचे पत्र क्र. MSSDS / DAKSH / २०२५/२२०, दि.०५/०३/२०२५.

४) दक्ष राज्य समन्वय समितीच्या तृतीय बैठकीचे इतिवृत्त, दि.२१/०३/ २०२५.

५) कौ. रो.उ. व ना. विभाग, शा.नि. क्र.दक्ष प्र-२०२४/प्र.क्र.२३/व्यशि-४, दि.२१/०३/२०२५.

**प्रस्तावना:-**

राज्यातील व्यावसायिक शिक्षण, नाविन्यता व कौशल्य वृद्धी विषयक योजनांची अंमलबजावणी करण्यासाठी, त्यासाठीच्या आवश्यक गुणवत्तापूर्ण पायाभूत सुविधा- कार्यप्रणालींचा विकास करण्यासाठी व त्यांच्या बळकटीकरण करण्यासाठी जागतिक बँक सहाय्यित “मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास”- (दक्ष) हा प्रकल्प राबविण्यास सं.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. दक्ष प्रकल्पाचा कालावधी ५ वर्षे इतका असून सदर प्रकल्प दि.०६/०२/२०२५ रोजी राज्यामध्ये कार्यान्वित झाला आहे.

२. दक्ष राज्य समन्वय समितीच्या तृतीय बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयास अनुसरुन दक्ष प्रकल्पांतर्गत करण्यात येणाऱ्या कामांना सं.क्र.५ येथील शासन निर्णयान्वये, प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापि, सदर शासन निर्णय प्रशासकीय कारणास्तव अधिक्रमित करण्यात येवून सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्याची व पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला रु.५०.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जागतिक बँक सहाय्यित "मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास"-(दक्ष) प्रकल्पांतर्गत दक्ष हॉलचे नुतनीकरण, महास्वयंम पोर्टल चे एकत्रिकरण, सल्लागार सेवा, प्रकल्प कक्ष, क्षमता बांधणी इत्यादी व तत्सम कामांसाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. तसेच या प्रकल्पांतर्गत पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला रु.१५.०० कोटी राज्य हिस्सा व रु.३५.०० कोटी जागतिक बँक हिस्सा असा एकूण रु.५०.०० कोटी (रुपये पन्नास कोटी मात्र) इतका निधी आयुक्त, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांना वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सं.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये आहरण व संवितरण अधिकारी प्राधिकृत करण्यात आले आहेत. त्यांनी दक्ष प्रकल्पासंबंधीची देयके कोषागारातून पारीत करुन घ्यावीत.

२. दक्ष प्रकल्पांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये पुरवणी मागणीद्वारे उपलब्ध झालेला निधी प्रकल्पांतर्गत येणाऱ्या कामांवरच खर्च करण्यात यावा. तसेच ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३. दक्ष प्रकल्पाची कामे सुरु करण्यापूर्वी दक्ष -राज्य समन्वय समितीची मान्यता घ्यावी.

४. सदर प्रशासकीय मान्यता म्हणजे क्षेत्रिय कार्यालयांकडून प्राप्त प्रस्तावातील तांत्रिक बाबी, निविदा विषयक केलेली कार्यवाही व क्षेत्रिय निर्णय किंवा अनियमितता असल्यास त्यास शासनाची मान्यता गृहीत धरण्यात येऊ नये. सबब, असे प्रकरण उद्भवल्यास त्यास संबंधित अंमलबजावणी यंत्रणा सर्वस्वी जबाबदार असेल. सदर कामांना सुधारीत प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता आवश्यकता राहणार नाही याची दक्षता संबंधितांनी घ्यावी.

५. दक्ष प्रकल्पांतर्गत येणाऱ्या कामांचा खर्च "मागणी क्रमांक झेडए-२ २२३०, कामगार, सेवायोजन व कौशल्य विकास ०२, सेवायोजन सेवा ००१, संचालन व प्रशासन (०१) सेवायोजन संचालक (०१) (१७) मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास (दक्ष) प्रकल्प (राज्य हिस्सा ३०%) (कार्यक्रम) (२२३०A८४४) ३१-सहायक अनुदान (वेतनेत्तर)"

तसेच "मागणी क्रमांक झेडए-२ २२३०, कामगार, सेवायोजन व कौशल्य विकास ०२, सेवायोजन सेवा ००१, संचालन व प्रशासन (०१) सेवायोजन संचालक (०१) (१८) मानवी विकासासाठी उपयोजित ज्ञान आणि कौशल्याचा विकास (दक्ष) प्रकल्प (जागतिक बँक हिस्सा ७०%) (कार्यक्रम) (२२३०A८५३) ३१-सहायक अनुदान (वेतनेत्तर)" या लेखाशीर्षांतर्गत करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच

वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१३१/व्यय-६ दि.२९/०३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय यांनी सदर निधीचा विनियोग केल्यानंतर या संदर्भातील लेखे लेखाशीर्षनिहाय अद्ययावत ठेवावेत.

८. दक्ष प्रकल्पाबाबतचा सं.क्र.५ येथील निर्गमित शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२५०३२९१९४५५०२२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MITHUN MOHANRAO SALUNKHE

Digitally signed by MITHUN MOHANRAO SALUNKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=eb410b645758d07ea6303743e3a96f12f7b5ea5c78305aa3546f1b05a4d188d9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=928224E8C07F06F0A63241EEC16360F9961117B3DFDA771ED6746D1433B5EA7A, cn=MITHUN MOHANRAO SALUNKHE
Date: 2025.03.29 19:46:42 +05'30'

**(मिथुन साळुंखे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र राज्य**

प्रत,

१.मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा. उप मुख्यमंत्री (वित्त)यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.सर्व मा.मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५.मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद / विधानसभा, विधानमंडळ, मुंबई.
६.अ.मु.स., कौ.रो.उ.व ना. विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७.प्रकल्प संचालक तथा आयुक्त, कौ.वि.,रो. व उ. आयुक्तालय, नवी मुंबई.
८.कुलगुरु, रतन टाटा महाराष्ट्र राज्य कौशल्य विद्यापीठ, मुंबई.
९.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.संचालक, महाराष्ट्र राज्य कौशल्य, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण मंडळ, मुंबई.
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, मुंबई.
१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य नाविन्यता सोसायटी, मुंबई.
१३.श्री. प्रद्युम्न भट्टाचारजी, शिक्षण तज्ञ-दक्ष प्रकल्प, जागतिक बँक,नवी दिल्ली.
१४.महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१५.जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे.
१६.अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई,
१७.कार्यासन अधिकारी, प्रशा-३ कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८.वि.का.अ, कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई
१९.निवड नस्ती (व्यशि-४)